**<u>येवला, जि. नाशिक येथील मुक्तीभूमीला “ब” वर्ग तीर्थक्षेत्राचा दर्जा देण्याबाबत.</u>**




**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एमयुएम-२०२१/प्र.क्र. २२१/नवि-१७**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक:- ०६ डिसेंबर, २०२१**

**<u>वाचा</u> :-**

१) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.तिक्षेवि-२००२/५६८/प्र.क्र.८९/२००२/नवि-१८, दि.२४.०८.२००४.

२) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र.संकलन-३/२३११६/२०२१/जा.क्र.१६७२१, दि.०२.०८.२०२१.

**<u>प्रस्तावना</u>:-**

राज्यातील नागरी/ग्रामीण क्षेत्रातील तीर्थक्षेत्रांची निवड करणे, तीर्थक्षेत्रांचे वर्गीकरण करणे आणि तीर्थक्षेत्र विकास योजनांचे आराखडे तयार करणे, तसेच तत्संबंधी निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचे निकष संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेले आहेत.

सन २०१८ च्या पहिल्या अधिवेशनात उपस्थित झालेल्या विधनापरिषद तारांकित प्रश्न क्र. ३९३६१ (येवला, जि. नाशिक येथील मुक्तीभूमीला “ब” वर्ग तीर्थक्षेत्राचा दर्जा मिळण्याबाबत) च्या अनुषंगाने, तत्कालीन मा. मुख्यमंत्री महोदय यांनी “प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर उचित कार्यवाही करण्यात येईल” (विधानपरिषद आश्वासन क्र.४४१) असे आश्वाासन दिलेले आहे. सदर आश्वासनाच्या पुर्ततेच्या अनुषंगाने, संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयातील निकषांन्वये विभागीय आयुक्त, नाशिक यांनी संदर्भाधीन क्र. २ येथील पत्रान्वये येवला, जि. नाशिक येथील मुक्तीभूमीला “ब” वर्ग तीर्थक्षेत्राचा दर्जा मिळण्याबाबत प्रस्ताव शिफारशीसह शासनास सादर केला आहे.

येवला, जि. नाशिक येथील मुक्तीभूमीला “ब” वर्ग तीर्थक्षेत्राचा दर्जा मिळण्याबाबत येवला नगरपरिषदेने सर्वसाधारण सभा ठराव क्र. ३२, दि.१३.०७.२०१८ असा ठराव पारीत केला आहे. येवला शहर हे नाशिक निफाड औरंगाबाद रस्ता व मालेगांव मनमाड कोपरगांव अहमदनगर रस्त्यावरील महत्त्वाचे ऐतिहासिक शहर आहे. येवला नगरपरिषद क्षेत्रातील मुक्तीभुमीच्या जागेची मालकी ७/१२ च्या उताऱ्यानुसार गट क्र. ४ मधील १.०० हे.आर. क्षेत्र हे भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर स्मारकाकरिता अध्यक्ष, मुक्ती प्रतिष्ठान, येवला यांच्या कब्जा व वहीवाटीत आहे. तसेच उर्वरित ००.९९.९५ हे.आर. क्षेत्र हे महाराष्ट्र शासन व २.३१.०४ हे.आर. क्षेत्र विभागीय समाज कल्याण विभागाच्या ताब्यात असून, ट्रस्टच्या नोंदणीचे प्रमाणपत्र सार्वजनिक बांधकाम विभागाकडे वर्ग केले आहे.

सदर जागा येवला नगरपरिषद हद्दीतील स. नं. ४ पै. कोर्ट रोड भागातील असून, सदर ठिकाणी महामानव डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे पदस्पर्श होऊन दि. १३ ऑक्टोबर, १९३५ रोजी धर्मांतराची घोषणा केलेली असल्याने, या जागेस विशेष असे अनन्य साधारण महत्त्व प्राप्त झालेले आहे. याठिकाणी दरवर्षी १३ ऑक्टोबर, विजयादशमी, १४ एप्रिल तसेच प्रत्येक पोर्णिमेच्या दिवशी लाखो अनुयायी येत असतात. यावेळी मोठा जनसमुदाय उपस्थित असतो. यास्तव या जागेस "तीर्थक्षत्राचे" स्वरुप तयार झालेले आहे. सदरची जागा ही "मुक्तीभूमी" करीता आरक्षित आहे. सदर मुक्तीभूमीचा विकास सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात आलेला आहे. या तीर्थक्षेत्रावर नगरपरिषदेमार्फत वेळोवेळी पाण्याची सुविधा, पार्किंग व्यवस्था, मोबाईल टॉयलेट व्यवस्था केली जाते. सदरची जागा समाज कल्याण विभाग यांच्या मालकीची आहे. सदर ठिकाणी देखभाल व दुरुस्ती डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे "बार्टी" या संस्थेमार्फत केली जाते.

या जागेचे महत्त्व लक्षात घेवून, सदरील जागेवर सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत विश्वभुषण स्तुपाचे रु.१३००.०० लक्ष किंमतीचे बांधकाम पुर्ण झालेले असून त्यामध्ये विश्वभुषण स्तुप, भगवान गौतम बुद्धाची मुर्ती व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांचा पुतळा इ. कामे करण्यात आली आहेत व टप्पा-२ अंतर्गत प्रशिक्षण केंद्र, भिख्खु निवास, भिख्खु पाठशाला, ॲम्फीथेटर, कर्मचारी ३ व ४ यांची निवासस्थाने व बगीचा इ. कामे प्रस्तावित आहेत.

उक्त बाबी विचारात घेता, येवला, जि. नाशिक येथील मुक्तीभूमीला "ब" वर्ग तीर्थक्षेत्राचा दर्जा देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयातील निकषांन्वये विभागीय आयुक्त, नाशिक यांनी शिफारशीसह सादर केलेल्या प्रस्तावातील प्रस्तावनेत नमूद बाबीं विचारात घेता, येवला, जि. नाशिक येथील मुक्तीभूमीला "ब" वर्ग तीर्थक्षेत्राचा दर्जा देण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२०६१२४७१२४१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Digitally signed by Vidya Ramappa Hampayya
Date: 2021.12.06 12:48:29 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल महोदयांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, पर्यटन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.
१२. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
१३. जिल्हाधिकारी, नाशिक.
१४. मुख्याधिकारी, येवला नगरपरिषद, येवला, जि. नाशिक.
१५. निवडनस्ती (नवि-१७).